**अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांच्या निवडीकरिता असलेल्या निवड समितीची पुर्नरचना करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र. एबावि-२००९/प्र.क्र.७८/का-६
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ६ जुलै, २०१०.

**<u>वाचा</u> :-** १. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-१०९५/प्र.क्र.८९/का-६, दिनांक १०.२.१९९६
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-१०९५/प्र.क्र.८९/का-६, दिनांक १८.३.१९९६
३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-१०९५/प्र.क्र.८९/का-६, दिनांक २८.१.१९९७
४. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००२/प्र.क्र.४१७/का-६, दिनांक १४.१.२००४
५. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००६/प्र.क्र.१८५/का-६, दिनांक ८.८.२००६
६. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००७/प्र.क्र.२५१/का-६,दिनांक १४.९.२००७
७. भारत सरकारच्या महिला व बाल विकास विभाग मंत्रालयाचे एफ नं. १-१४/२००६-सीडी-१, दिनांक २८.५.२००७ चे पत्र.
८. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००९/प्र.क्र.७८/का-६, दिनांक २७.१.२०१०
९. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००९/प्र.क्र.७८/का-६, दिनांक ७.०५.२०१०

**<u>प्रस्तावना</u> :-** वाचा क्र. ७ येथील केंद्र शासनाच्या पत्रातील निर्देशानुसार वाचा क्र. १ ते ६ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन वाचा क्र. ८ व ९ येथील शासन निर्णयानुसार अंगणवाडी कर्मचा-यांच्या नियुक्तीसाठी निवड समिति गठीत करण्यात आली आहे. परंतु, लोकप्रतिनिधींकडून निवड समितीत अजूनही काही सुधारणा करण्याची मागणी सातत्याने करण्यात येत असल्याने आता पुन्हा सदरहू निवड समितीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-** त्यास अनुसरुन समक्रमांकाच्या दिनांक ७.०५.२०१० च्या शासन निर्णयात अंशतः सुधारणा करुन एकात्मिक बाल विकास सेवा योजनांतर्गत ग्रामीण व आदिवासी प्रकल्पासाठी तालुकानिहाय व नागरी प्रकल्पासाठी संबंधित नगरपालिका / महानगरपालिकानिहाय, अंगणवाडी सेविका, मदतनिस व मिनी अंगणवाडी सेविका या मानधनी पदावरील निवडीसाठी असलेल्या निवड समितीचे, खालीलप्रमाणे पुर्नगठन करण्यात येत आहे.

**<u>(अ) ग्रामीण व आदिवासी प्रकल्पासाठी तालुकानिहाय निवडसमिती :-</u>**

१) संबंधित जिल्हयाच्या मा. पालकमंत्र्यांनी नामनिर्देशित केलेली संबंधित तालुक्यातील व्यक्ती (बालके / महिलांशी संबंधित सामाजिक कार्य करणारी) **- अध्यक्ष**

२) संबंधित तालुक्यातील उप जिल्हा रुग्णालय / ग्रामीण रुग्णालय यांचे अधिक्षक / तालुका वैद्यकीय अधिकारी **- सदस्य**

३) संबंधित जिल्हयाच्या मा. पालकमंत्र्यांनी नामनिर्देशित केलेले संबंधित पंचायत समितीचे सदस्य (महिला सदस्यास प्राधान्य) **- सदस्य**

४) संबंधित प्रकल्पाचा बाल विकास प्रकल्प अधिकारी **- सदस्य सचिव**

**(ब) नागरी प्रकल्पासाठी प्रकल्पनिहाय निवडसमिती :-**

१) संबंधित जिल्हयाच्या मा. पालकमंत्र्यांनी नामनिर्देशित केलेली संबंधित तालुका क्षेत्रातील व्यक्ती (बालके / महिलांशी संबंधित सामाजिक कार्य करणारी) - **अध्यक्ष**

२) संबंधित प्रकल्प क्षेत्रातील किंवा नजिकच्या क्षेत्रातील महानगरपालिका /नगरपालिकेचे वैद्यकिय अधिकारी - **सदस्य**

३) संबंधित जिल्हयाच्या मा. पालकमंत्र्यांनी नामनिर्देशित केलेले नागरी प्रकल्पाच्या क्षेत्रातील संबंधित महानगरपालिका / नगरपालिकेचा सदस्य (महिला सदस्यास प्राधान्य) - **सदस्य**

४) संबंधित प्रकल्पाचा बाल विकास प्रकल्प अधिकारी - **सदस्य सचिव**

२. निवडसमितीचे अध्यक्ष व पंचायत समितीचे / महानगरपालिका / नगरपालिकेचा सदस्य या अशासकीय सदस्यांना या समितीच्या कामाकाजासाठी कोणत्याही प्रकारचे वित्तीय लाभ देय राहणार नाहीत. तसेच या समितीसाठी स्वतंत्र कार्यालयसुध्दा राहणार नाही.

३. निवडसमितीचे अध्यक्ष व पंचायत समितीचे / महानगरपालिका / नगरपालिकेचा सदस्य या अशासकीय सदस्य यांची नियुक्ती, नियुक्तीच्या दिनांकापासून ३ वर्षासाठी राहील. परंतु, अध्यक्ष व अशासकीय सदस्य यांच्याविरुध्द लेखी तक्रार प्राप्त झाल्यास किंवा ते निवडसमितीची कर्तव्ये पार पाडण्यास असमर्थ असल्याची मा. पालकमंत्र्यांची खात्री झाल्यास वरील कालावधी पूर्ण होण्यापूर्वीच त्यांना पदावरुन कमी करण्याचा निर्णय घेण्याचे अधिकार संबंधित मा. पालकमंत्री यांना राहतील. मा. पालकमंत्री यांच्या या संदर्भातील निर्णयाचे विरुध्द शासनाकडे अपिल करता येईल व शासनाचा या संदर्भातील निर्णय अंतिम राहील.

४. शासन निर्णयानुसार थेट नियुक्तीबाबतची प्रकरणे प्रथम निकाली काढावीत व त्यानंतर उर्वरित अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांची पदे तसेच सेवानिवृत्तीमुळे व अन्य कारणास्तव ही पदे रिक्त झाल्यानंतर ३० दिवसांच्या आत जाहिरात देऊन अर्ज मागविण्यात यावेत. शैक्षणिक अर्हता, विधवा / घटस्फोटिता, जात, अनुभवाबाबतचे निश्चित गुण, यासंबंधीचे सक्षम प्राधिका-याने दिलेल्या प्रमाणपत्राची पडताळणी करुन उमेदवारनिहाय त्यांना मिळालेले निश्चित गुण यांची यादी मुलाखत घेण्यापूर्वी, ज्या ठिकाणी मुलाखती घेण्यात येणार आहेत तेथे नोटीस बोर्डवर, अर्ज केलेल्या किमान तीन उमेदवारांची स्वाक्षरी घेऊन लावण्यात यावी. सदर निश्चित गुणांची यादी जाहिरातीनुसार अर्ज सादर करतांना त्यासोबत असलेल्या प्रमाणपत्रांच्या आधारेच तयार करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत अर्ज सादर केल्यानंतर दाखल केलेल्या प्रमाणपत्रांच्या गुण देण्याकरीता विचार करण्यात येवू नये. सदर यादी नोटीस बोर्डवर लावल्याशिवाय मुलाखती घेण्यात येऊ नयेत. त्यानंतर ३० दिवसांच्या आत मुलाखतीचा कार्यक्रम निश्चित करण्यात यावा. मुलाखतीचा कार्यक्रम शक्यतो पुढे ढकलू नये. (या संदर्भात शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग, क्र.एबावि-२००७/प्र.क्र.१४३/का.६, दिनांक १२ मार्च, २००८ चे पालन करण्यात यावे.)

५.	उमेदवारांच्या मुलाखती प्रत्यक्ष प्रकल्प क्षेत्रातच आयोजित करण्यात याव्यात. उमेदवारांची मुलाखत ज्या दिवशी घेण्यात येईल त्याच दिवशी संध्याकाळपर्यंत कार्यालयाच्या सूचना फलकावर निवड करण्यात आलेल्या उमदवारांची निवड यादी घोषित करण्यात यावी व त्याच्या पुढील दिवशी सर्व नियुक्ती आदेश / पत्र जारी करण्यात यावेत. याबाबतची जबाबदारी संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी यांची राहील.

६.	वरील अटी व शर्तीप्रमाणे पदे रिक्त झाल्यानंतर ते भरण्याकरिता घालून देण्यात आलेल्या कालमर्यादेचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित सदस्य सचिव यांच्यावर राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ज. कि. मगरे)
सह सचिव

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री व मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबइ
मा. राज्यमंत्री (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
विभागीय आयुक्त, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण)
बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई - १
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं.१, योगक्षेम समोर, नरीमन पॉईंट, मुंबई - २०
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई - ४
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई - १३
इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, दादर, मुंबई - २५
नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई - २१
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई - २८
महिला व बाल विकास विभागातील सर्व उप सचिव / अवर सचिव व कार्यासने
निवड नस्ती (कार्यासन-६)